मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या न्यायनिर्णयानुसार गोवंडी, मुंबई येथे दुषित गटारामध्ये उतरुन काम करतांना मृत झालेल्या मॅन्युअल स्कॅव्हेंजर्स यांच्या वारसांना नुकसान भरपाई अदा करणेसाठी जिल्हाधिकारी, मुंबई यांना "एक वेळेची विशेष बाब" म्हणून निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. हामैऊ-२०२१/प्र.क्र. २६/सआक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- १६ नोव्हेंबर, २०२१.**

**वाचा :-**

१) हाताने मैला उचलणा-या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन करणे अधिनियम २०१३,
२) शासन निर्णय क्र. हामैऊ-२०१९/प्र.क्र. २६८/अजाक, दिनांक १२/१२/२०१९,
३) मा.उच्च न्यायालयाचे क्रमांक-पीएचके/९६१९/डब्ल्यु एम, दि.७/१०/२०२१ चे पत्र व त्यासोबतचे दि.१७/९/२०२१ चे आदेश,
४) जिल्हाधिकारी, मुंबई यांची क्र.सी/कार्या-७ ड/ने.आ./कावि ५०२/२०२१, दि.२२/९/२०२१ व दिनांक ८/१०/२०२१ ची पत्रे व सहपत्रे,
५) शासन निर्णय, क्रमांक-बीजीटी २०२१/प्र.क्र.९६/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १६/११/२०२१.

**प्रस्तावना :-**

मुंबई उपनगरातील गणेशवाडी, गोवंडी स्टेशन रोड, देवनार, मुंबई येथील मोरया एस.आर.ए.को.ऑप.हौ.सो.च्या ड्रेनेज टँकमध्ये उतरून साफ सफाई करतांना ३ इसमांचा विषारी वायुमुळे मृत्यु झाल्याची घटनेच्या अनुषंगाने मृत मॅन्युअल स्कॅव्हेंजर्स यांच्या वारस श्रीमती विमला गोविंद चोरटीया व इतर २ यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र.१५६५१/२०२१ च्या संदर्भात, मा.उच्च न्यायालयाने दिनांक १७/९/२०२१ रोजी दिलेल्या आदेशान्वये मयत व्यक्तींच्या वारसांना ४ आठवडयांच्या मुदतीत प्रत्येकी रु.१० लाख नुकसान भरपाई देणेबाबतचे आदेश जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना दिले आहेत.

त्यानुसार मे. कॉंक्रेट बिल्डर व मोरया एस.आर.ए.को.ऑप.हौ.सो. पदाधिकारी यांचेकडून वसूल करण्यात आलेल्या एकूण रु.३,७५,०००/- इतक्या रक्कमेतून प्रत्येकी रु.१,२५,०००/- एवढी रक्कम ३ मयत व्यक्तींचे वारसांना धनादेशाद्वारे अदा करण्यात आली असून, उर्वरित रक्कम रु.८,७५,०००/- प्रत्येकी याप्रमाणे ३ मयत व्यक्तींच्या वारसांना एकूण रु.२६,२५,०००/- एवढी रक्कम अदा करण्यासाठी निधी सामाजिक न्याय विभागाने तात्काळ उपलब्ध करुन देण्याची विनंती जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई यांनी केली होती.

९. मा.उच्च न्यायालयाने दिलेले आदेशाच्या व जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने मृत मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सच्या वारसांना उर्वरित रक्कम रु.८,७५,०००/- प्रत्येकी याप्रमाणे ३ मयत व्यक्तींच्या वारसांना एकूण रु.२६,२५,०००/- एवढी रक्कम नुकसान भरपाईपोटी अदा करणे या प्रयोजनासाठी "**एक वेळची विशेष बाब"** म्हणून जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब या विभागाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र.१५६५१/२०२१ च्या अनुषंगाने दिलेल्या दिनांक १७/९/२०२१ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना संबंधित मृत मॅन्युअल स्कॅव्हेंजर्स यांच्या वारसांना उर्वरित नुकसान भरपाईची रक्कम अदा करण्यासाठी रु.२६,२५,०००/-इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. मा.उच्च न्यायालयाच्या उपरोक्त याचिका क्र.१५६५१/२०२१ न्यायालयीन प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या दिनांक १७/९/२०२१ च्या आदेशानुसार, जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई यांना "**एक वेळची विशेष बाब"** म्हणून अदा करण्यात आलेली रक्कम रु.२६,२५,०००/- ही मे.कॉंक्रेट बिल्डर व मोरया एस.आर.ए.को.ऑप.हौ.सो.पदाधिकारी यांचेकडून वसूली करुन शासनास अदा करणे आवश्यक आहे.

३. एखादया खाजगी क्षेत्रात घडलेल्या घटनेप्रकरणी, संबंधित खाजगी संस्था रु.१० लाखाची नुकसान भरपाईची रक्कम अदा करण्यासाठी सक्षम नसल्यास, अशा वेळी संबंधित जिल्हाधिकारी यांनी यासंदर्भात सदर नुकसान भरपाईची रक्कम अदा करण्यासाठी लागणाऱ्या आकस्मिक खर्चाची त्यांच्या कार्यालयीन लेखाशिर्षाअंतर्गत तरतूद करावी.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या आदेशानुसार व जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई यांनी शासनास केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने एकूण रु.२६,२५,०००/- एवढी रक्कम नुकसान भरपाईपोटी अदा करणे या प्रयोजनासाठी "**एक वेळची विशेष बाब"** म्हणून जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात येत असून सदरची रक्कम त्यांनी **दिनांक ३१/३/२०२२ पूर्वी** या विभागाच्या **"०२५००१०८" या शिर्षाखाली** जमा करण्यात यावी.

५. सदरील निधी **मागणी क्र.एन-३, (०३)(०३) महाराष्ट्र राज्य सफाई कर्मचारी आयोगास सहायक अनुदान (अ.जा.उ.यो.) कार्यक्रम, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२२५२६३१)** या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

६. सदर नुकसान भरपाईची रक्कम पुढील कार्यवाहीकरीता प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, नवी मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहे. तसेच, सदरची रक्कम आहरीत **करण्याकरीता प्रादेशिक**

**उपायुक्त, समाजकल्याण, कोकण भवन, नवी मुंबई यांचे कार्यालयातील लेखा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी महाराष्ट्र कोषागार नियम ४४ मधील नमुन्यातील देयकान्वये आहरीत करावे. तसेच, सदर रक्कम जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई यांच्या अधिपत्याखालील तहसीलदार, कुर्ला (मुलूंड), मुंबई यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९५८/व्यय-१४, दिनांक २९/१०/२०२१ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असून तो महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११११६१८१४५४२३२२ असा आहे. हा शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, pseudonym=AE89A440549540E82C5C3FE007D468E20DCA5112, serialNumber=F049989DBBEF93340E9EDD88AF960A0963746D42BAA5C948405B62E821529A99, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2021.11.16 18:18:36 +05'30'

**( रा.ना.सवने )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मुख्य सरकारी अभियोक्ता, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
२) अ.मु.स. (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) अ.मु.स. (सामाजिक न्याय), मंत्रालय, मुंबई,
४) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई,
७) प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, कोकण भवन, नवी मुंबई,
८) सहाय्यक आयुक्त,समाजकल्याण, मुंबई उपनगर, मुंबई,
९) जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई,
१०) तहसीलदार, कुर्ला (मुलुंड), मुंबई,
११) निवडनस्ती (अजाक).